शासकीय कर्मचा-यांना घरबांधणी अग्रीम मंजूर करण्यासाठी सैनिकी सेवा विचारात घेण्याबाबत

---

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक अग्रिम-1096/प्र. क्र 4/96/विनियम,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 23 जून 1997

महाराष्ट्र राज्य शासनाच्या सेवेतील पुनर्नियुक्त माजी सैनिक असलेल्या शासकीय कर्मचा-यांना घरबांधणी अग्रीम मंजूर करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**निर्णय**

महाराष्ट्र राज्य शासन सेवेतील पुनर्नियुक्त माजी सैनिक असलेल्या शासकीय कर्मचा-यांना घरबांधणी अग्रीम पुढील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात यावे.

(1) घरबांधणी अग्रीम मंजूर करताना पुनर्नियुक्त माजी सैनिक शासकीय कर्मचा-यांची लष्करातील सेवा विचारात घेण्यात यावी.

(2) सैनिकी सेवेत असताना त्या कर्मचा-यांना घरबांधणी अग्रीम मंजूर केलेले नसावे.

(3) माजी सैनिकांच्या पुनर्नियुक्तीच्या सेवा कालावधीत घरबांधणी अग्रीम व्याजासह वसूल होण्याबाबत मंजुरी प्राधिका-याची खात्री असली पाहिजे.

(4) माजी सैनिकांची शासकीय सेवा निवृत्तिवेतनार्ह होत असली पाहिजे.

(5) माजी सैनिक असलेला शासकीय कर्मचारी वयाच्या अटींच्या शिथिलीकरणामुळे उशिरात उशिरा 45 व्या वर्षी दाखल झाला तर व त्याने महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन)नियम, 1982 मधील नियम 41 (3) मधील विकल्प स्वीकारला आहे किंवा कसे हे सक्षम प्राधिका-याने तपासून पाहिले पाहिजे.

(6) मुंबई वित्तीय नियम, 1959 मधील नियम 134 च्या परिशिष्ट 26 मधील अटींच्या व वेळोवेळी निर्गमित होणा-या कार्यकारी आदेशांच्या अधीन राहून सदरहू कर्मचा-यांची कर्ज परत करण्याची क्षमता पाहूनच माजी सैनिक असलेल्या कर्मचा-यांना घरबांधणी अग्रीम मंजूर करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अं. ज. खानविलकर,
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग.

प्रति

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-1, महाराष्ट्र, मुंबई 400 020,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-1, महाराष्ट्र, मुंबई 400 020,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-2, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल(लेखा परीक्षा)-2, महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे/मुंबई,

(कृ. मा. प.

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई,
उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांच्या अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नीव दिल्ली 110 001,
निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग.

---

* पत्राने.

---

एच-548(12500+10-6-97)अ.